सुहित जीवन ट्रस्ट, पेण, जि.रायगड संचलीत सुमंगल मतीमंद मुलांची शाळा व एकलव्य व्यावसायिक प्रशिक्षण केंद्र, जि.रायगड या दिव्यांगांच्या मतीमंद विशेष प्रवर्गाच्या कायम विनाअनुदान तत्वावरील शाळेस विशेष बाब म्हणून अनुदान तत्वावर मान्यता प्रदान करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१७/प्र.क्र.३७८/दि.क.१
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ५ मे, २०२२.

वाचा:- १) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.इडीडी २००१/ प्र.क्र.५०२/सुधार-२, दि.१९.७.२००३ व समक्रमांक शासन पुरकपत्र दि.४.१२.२००३.

२) शासन निर्णय सामाजिक न्याय विभाग क्र.इडीडी २००३/प्र.क्र.३४०/भाग-२/सुधार-२, दि.१८.८.२००४ व दि.३०.१.२००६.

३) आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.१) अका/प्र-४/मती/अनुदान मान्यता/ सुहित ट्रस्ट/ रायगड/२०१८-१९/२७३१, दि.२.७.२०१८ व २) दिकआ/प्र-४/ सुहित/रायगड/अहवाल/२०२१-२२/५४०४, दि.१९.८.२०२१.

४) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.इडीडी २०१२/प्र.क्र.६७/ अ.क.१, दि.८.४.२०१५.

प्रस्तावना :-

सुहित जीवन ट्रस्ट, पेण, जि.रायगड संचलीत सुमंगल मतीमंद मुलांची शाळा व एकलव्य व्यावसायिक प्रशिक्षण केंद्र, जि.रायगड या कायम विनाअनुदान तत्वावरील शाळेस विशेष बाब म्हणून अनुदान तत्वावर मान्यता प्रदान करण्याबाबतच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

सुहित जीवन ट्रस्ट, पेण, जि.रायगड संचलीत सुमंगल मतीमंद मुलांची शाळा व एकलव्य व्यावसायिक प्रशिक्षण केंद्र, जि.रायगड या मतीमंद प्रवर्गाच्या विशेष शाळेला ७५ अनिवासी कायम विनाअनुदानीत तत्तावर आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांनी अपंग व्यक्ती अधिनियम, १९९५ अन्वये नोंदणी प्रमाणपत्र क्र.ए-०९४२, दि.२८.९.२००५ रोजी कायम विनाअनुदान तत्वावर शाळेस मान्यता प्रदान करण्यात आली आहे. तसेच मतीमंद मुलांसारख्या सामाजिक व शारिरीक दृष्टया दुर्बल घटकास बृहत आरखडा व धोरणा अभावी प्रदीर्घकाळ वंचित ठेवणे शक्य नसल्यामुळे सुहित जीवन ट्रस्ट संचलीत मतीमंद मुलांची शाळा, जि.रायगड या शाळेस विशेष बाब म्हणून मा.मुख्यमंत्री महोदयांनी अनुदान तत्वावर मान्यता दिली आहे. त्यानुषंगाने उक्त शाळेस खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती खालीलप्रमाणे आहेत :-**

१) सदर शाळेस/कार्यशाळेस शासनाने वेळोवेळी निश्चित करतील अशा अटी व शर्ती लागू राहतील.

२) सदर शाळेस/कर्मशाळेस अनुदान तत्वावर मान्यता प्रदान करण्यात येत असून, याअनुषंगाने वेतनेत्तर अनुदान व पदनिर्मितीबाबत वित्त विभाग व उच्च स्तरीय सचिव समितीच्या मान्यतेच्या अटींच्या अधीन राहून सदरहू मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३) सदर शाळेस सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दि.८.४.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयाच्या परिच्छेद-२ मधील १ ते २७ प्रमाणे अटी व शर्ती लागू राहतील.

४) सदर विशेष शाळेची तपासणी शासन निर्णय दि.८.४.२०१५ मधील प्रपत्र-ब अनुसार दरवर्षी करावी व प्रपत्र-क प्रमाणे दिव्यांग शाळेचे मुल्यांकन करुन गुणांकन करावे आणि त्यानुसार संबंधीत विशेष शाळेस अनुदानासाठी पात्र ठरविण्यात यावे.

५) सदर दिव्यांगांच्या विशेष शाळा/कर्मशाळांना केंद्र शासन स्थानिक स्वराज्य संस्थांकडून किंवा इतर संस्थांकडून नियमित अनुदान मिळत आहे असे निदर्शनास आल्यास सदर संस्था राज्य शासनाचे अनुदान मिळण्यास अपात्र ठरेल.

६) शासनाने अनुदान तत्वावर आणण्याकरीता वेळेवेळी विहित केलेल्या अटी व शर्ती आणि कार्यपध्दतीचे पालन झालेले नाही असे आढळून आल्यास त्या संस्थेची मान्यता रद्द करण्यात येईल.

७) सदरहू शाळेस ७५ अनिवासी मान्य विद्यार्थी संख्येवर अनुदान तत्वावर मान्यता प्रदान करण्यात येत असून दि.१८.८.२००४ च्या आकृतीबंधानुसार आवश्यक असणारा कर्मचारी वृदांबाबतचा प्रस्ताव वित्त विभागामार्फत उच्च स्तरीय सचिव समितीच्या मान्यतेसाठी सादर करावा. सदर मान्यतेशिवाय सदर पदांना पदमान्यता देण्यात येऊ नये.

८) मा.न्यायालयात दाखल असलेल्या रिट याचिका क्र.६९०/२०१३ डॉ.बाबासाहेब परांजपे प्रतिष्ठान आंबेजोगाई विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर या प्रकरणी मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांनी दि.३.९.२०१३ अन्वये शासनाने दिव्यांगांच्या विशेष शाळा/कार्यशाळांच्या अनुदानाबाबत धोरण ठरविण्याचे आदेश दिले आहेत. सदर धोरणातील निकषांच्या अधिन राहून सदर शाळेस अनुदान तत्वावर मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

९) मतीमंद मुलांसारख्या सामाजिक व शारिरीक दृष्टया दुर्बल घटकास बृहत आरखडा व धोरणा अभावी प्रदीर्घकाळ वंचित ठेवणे शक्य नसल्यामुळे सुहित जीवन ट्रस्ट संचलीत मतीमंद मुलांची शाळा, जि.रायगड या शाळेस मा.मुख्यमंत्री महोदय यांनी “विशेष बाब” म्हणून मान्यता दिली आहे. परंतु यापुढे इतर दिव्यांगांच्या शाळा/कर्मशाळांच्या मान्यतेसाठी ही बाब लागू असणार नाही व हे प्रकरण पुर्वोउदाहरण म्हणून देता येणार नाही.

२. सदर शासन निर्णय हा मा.मुख्यमंत्री महोदय यांच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०५०६१५३१२८८७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2022.05.06 15:32:11 +05'30'

**( वि. पुं. घोडके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा.मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
३) मा.राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
४) सचिव (सा.न्या.) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक.
५) आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
६) प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण, कोकण विभाग
७) जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड
९) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
११) अध्यक्ष/सचिव, सुहित जीवन ट्रस्ट, पेण, जि.रायगड संचलीत सुमंगल मतीमंद मुलांची शाळा व एकलव्य व्यावसायिक प्रशिक्षण केंद्र, जि.रायगड.
१२) निवड नस्ती, दिव्यांग कल्याण-१.

****